**८ मार्च – 'जागतिक महिला दिन'**
**साजरा करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन,**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.३८/एसडी.- ४.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ४ मार्च, २०२२.

**प्रस्तावना-**

सामाजिक राजकीय अवकाशात स्त्रियांना समान अधिकार मिळावेत, याकरता जगभर चळवळी झाल्या. प्रतिकूल परिस्थिती व अनेक समस्यांना तोंड देत स्त्री सक्षमपणे उभी रहावी यासाठी अनेक व्यक्ती, संघटना, शासन प्रणाली व समाजातील सर्व घटकांनी वेळोवेळी अनेक चळवळी उभारल्या. यातूनच आज स्त्रिया प्रत्येक क्षेत्रामध्ये आघाडीवर असलेल्या आपणास दिसून येतात. या संघर्षमय प्रवासात स्त्रियांसाठी व तिच्या हक्कासाठी अनेक कायदे निर्माण झाले असून त्यांची अंमलबजावणी देखील प्रभावीपणे होताना दिसत आहे.

भारतात क्रांतीज्योती सावित्रीबाई फुले आणि फातिमा शेख यांनी ज्ञानाची कवाडे खुली करत लाखो स्त्रियांना नवे क्षितीज दाखवले आणि नवी पहाट उगवली. समताधिष्ठित समाजाच्या निर्मितीमध्ये सर्वांचा सहभाग मिळावा व त्या दिशेने प्रयत्न करण्यासाठी प्रेरणा मिळावी म्हणून 'जागतिक महिला दिन' साजरा केला जातो.

**शासन परिपत्रक -**

दिनांक ८ मार्च, १९०८ रोजी अमेरिकेतील महिलांनी स्वत:च्या हक्कासाठी दिलेल्या लढयाच्या सन्मानार्थ संपूर्ण जगभरात दरवर्षी ८ मार्च हा दिवस जागतिक महिला दिन म्हणून साजरा केला जातो. याचे औचित्य साधून दिनांक ८ मार्च, २०२२ ते दिनांक १२ मार्च, २०२२ पर्यंत महिला दिन सप्ताह साजरा करण्याचा निर्णय शासन स्तरावरुन घेण्यात आलेला आहे. या निमित्त राज्यस्तर, जिल्हास्तर व शाळास्तर खालील विविध कार्यक्रम साजरे करण्यात यावेत.

**राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषदेमार्फत राज्यस्तरावर Online/offline आयोजित करावयाचे कार्यक्रम -**

| अ.क्र | दिनांक | उपक्रमाचे नाव | उपक्रमाचे स्वरुप | वेळ |
|---|---|---|---|---|
| १. | ८ मार्च, २०२२ | जागर जाणिवांचा | मा.मंत्री महोदय यांच्या हस्ते मुलींच्या सक्षमीकरणास पोषक उपक्रमांचे उद्घाटन - ऑनलाईन | सकाळी ११ ते १ |
| २. | ९ मार्च, २०२२ | महिला सक्षमीकरण व समाजाचा बदलता दृष्टीकोन | (श्रीमती श्रुती तांबे, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ) यांचे मार्गदर्शनपर व्याख्यान - ऑनलाईन | सकाळी ११ ते १२ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३. | १० मार्च, २०२२ | घे भरारी करिअरच्या नवीन संधीबाबत मार्गदर्शन | मुलींच्या सक्षमीकरणासाठी त्यांना आर्थिक स्रोतांची माहिती देण्यासाठी करिअर मार्गदर्शन व शंका समाधान दिपाली दिवेकर , प्रशासन अधिकारी, मुरुड - ऑनलाईन | सकाळी ११ ते १२ |
| ४. | ११ मार्च, २०२२ | महिलांविषयी कायदे आणि जाणीव जागृती | ॲड. दिव्या चव्हाण मार्गदर्शन आणि प्रश्नोत्तरे -ऑनलाईन | सकाळी ११ ते १२ |
| ५. | १२ मार्च, २०२२ | माझी सखी, माझी सहचारी | सामाजिक, शैक्षणिक क्षेत्रामध्ये योगदान दिलेले स्नेहग्राम संस्थेचे श्रीमती विनया निंबाळकर व श्री महेश निंबाळकर- मुलाखत -ऑनलाईन | सकाळी ११ ते १२ |

**जिल्हास्तरावरून ऑनलाईन/ऑफलाईन आयोजित करावयाचे कार्यक्रम -**

| अ.क्र. | दिनांक | उपक्रमाचे नाव | उपक्रमाचे स्वरुप | स्तर | कोणासाठी |
|---|---|---|---|---|---|
| १. | ८ मार्च, २०२२ | वकृत्व स्पर्धा अनुभव कथन, | आवडती महिला खेळाडू/माझ्या आयुष्यातील प्रेरणादायी महिला /आवडती महिला राजकीय नेता यांच्या विषयी माहिती गोळा करून फोटो, व्हिडीओ फेसबुक, इन्स्टाग्राम, ट्वीटर यावर #womensdaymh2022 यासह अपलोड करणे. | जिल्हास्तर, तालुकास्तर व शाळास्तर | विद्यार्थी, शिक्षक व पालक |
| २. | ९ मार्च, २०२२ | समुपदेशन | किशोरवयीन मुला-मुलींसाठी विविध विषयांवर समुपदेशन सत्रांचे आयोजन (सायबर सुरक्षा, मासिक पाळी व्यवस्थापन इ.) | जिल्हास्तर, तालुकास्तर व शाळास्तर | शाळा, गाव व अंगणवाडी |
| ३. | १० मार्च, २०२२ | विद्यार्थ्यांचे चर्चासत्र | आजच्या युगातील स्त्रीयांच्या व मुलींच्या समस्या व त्यावरील उपाययोजना. | जिल्हास्तर, तालुकास्तर व शाळास्तर | माध्यमिक, उच्च माध्यमिक विद्यार्थी, शिक्षक व पालक |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ४. | ११ मार्च, २०२२ | महिला सक्षमीकरणावर आधारित चित्रपट/चित्र फितीच्या सहाय्याने अभिव्यक्ती करणे | महिला सक्षमीकरणावर आधारित चित्रपट/चित्रफिती दाखवून खुली चर्चा आयोजित करणे/विद्यार्थ्यांना पोक्सो विषयी माहिती, चांगला स्पर्श - वाईट स्पर्श या विषयी माहिती. | जिल्हास्तर, तालुकास्तर व शाळास्तर | माध्यमिक, उच्च माध्यमिक विद्यार्थी |
| ५. | १२ मार्च, २०२२ | व्याख्यान - जिल्ह्यातील प्रेरणादायी महिलेचे | स्त्री-पुरूष समानता ( कामांची समान विभागणी) याविषयावर शालेय मुला-मुलींना मार्गदर्शन करणे. | जिल्हास्तर, तालुकास्तर व शाळास्तर | माध्यमिक, उच्च माध्यमिक विद्यार्थी, शिक्षक व पालक |

वरील उपक्रमात सहभागी होऊन #महिलादिन२०२२, #womensdaymh2022 या #hashtag चा उपयोग करुन उपक्रमाशी संबधित व्हिडिओ व साहित्य विविध समाजमाध्यमांवर (Facebook, Instragram, Twitter) वर अपलोड करावे.

सदर कार्यक्रमाच्या आयोजनाबाबत शिक्षण संचालक (प्राथमिक ) व शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांनी आपल्या स्तरावरून आवश्यक त्यासूचना निर्गमित कराव्यात. सदर कार्यक्रमाचे आयोजन करीत असताना कोविड-१९ च्या प्रादुर्भावाच्या पार्श्वभूमीवर केंद्र व राज्य शासनाने वेळोवेळी दिलेल्या सामाजिक अंतर राखणे व स्वच्छतेच्या आवश्यक त्या सर्व सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

सदरचे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आलेले असून त्याचा सांकेतांक २०२२०३०७११३८२९९४२१ असा आहे. हे शासन परिपत्रक डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2022.03.07 11:41:46 +05'30'

**( इम्तियाज काझी )**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति ,**

१. मा .राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन, मुंबई,

२. मा . मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई,
३. मा . उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय, मुंबई,
४. सभापती,विधानपरिषद,महाराष्ट्र,मुंबई
५. अध्यक्ष,विधानसभा,महाराष्ट्र,मुंबई
६. मा.मंत्री,शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव,
७. मा.राज्यमंत्री,शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव,
८. सर्व मा.मंत्री /मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई ,
९. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई ,
१०. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,मंत्रालय,मुंबई,
११. सर्व मंत्रालयीन विभाग ,
१२.शालेय शिक्षण व क्रीडा विभागातील सर्व कार्यासने ,
१३.महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ( प्रसिद्धी देण्यासाठी )
१४. आयुक्त ( शिक्षण ),महाराष्ट्र राज्य,पुणे
१५. संचालक,राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद,महाराष्ट्र, पुणे
१६. शिक्षण संचालक ( प्राथमिक ), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७. शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च माध्यमिक ),महाराष्ट्र राज्य, पुणे
१८. सर्व विभागीय आयुक्त ,
१९.सर्व जिल्हाधिकारी ,
२०. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी ,
२१. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
२२.प्राचार्य जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, ( सर्व )
२३ . शिक्षणाधिकारी ( प्राथमिक / माध्यमिक / निरंतर ), जिल्हा परिषद ( सर्व )
२४. आयुक्त, सर्व महानगरपालिका,
२५. निवड नस्ती (कार्यासन-एसडी-४)